# महाराष्ट्र शासन

क्रमांक:-एमव्हीडी-१२०९/प्र.क्र.२२५/परि-४
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १ फेब्रुवारी, २०१०.

**विषय :- परिवहन आयुक्त कार्यालयात मे.पिटनी बाऊज कंपनीचे फ्रँकिंग मशीन बाय बॅक पध्दतीने खरेदी करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मंजूरी मिळणेबाबत.**

ज्ञापन :- परिवहन आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र.एफयुआर-०१२००४/५५/मशीन खरेदी/का.१०/०९/जा.क्र.१४८६०, दि. १५ डिसेंबर, २००९ ला अनुसरुन कळविण्यात येते की, मोटार वाहन विभागातील विविध कार्यालयांना, शासनाकडे, इतर कार्यालयात पत्रव्यवहार व माहितीची देवाण-घेवाण होण्याच्या दृष्टीने पत्रे पाठविण्याकरिता फ्रँकिंग मशीनची आवश्यकता असल्याने मे.पिटनी बाऊज कंपनीचे फ्रँकिंग मशीनचे ए-९०० मीटर युनीट बदलून त्याऐवजी नवीन बी-९००मीटर युनीट खरेदी करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. नवीन मीटर युनिट जुन्या मशीनच्या बदलात रु.१५,०००/- सवलतीसह रु. ४५,०००/- अधिक १२.५% सेवा शुल्क रु. ५०,५६५/- (४५,०००/-+५६२५/-) इतक्या किमतीत खरेदी करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

३. खरेदीकरिता येणारा खर्च "मागणी क्र.बी-३, मुख्य लेखाशीर्ष २०४१, वाहनावरील कर, ००१ संचालन व प्रशासन -०१ परिवहन आयुक्त (०१)(०१) आस्थापना, (२०४१००१८३) कार्यालयीन खर्च" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २००९-२०१० यावर्षी उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. हे आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ च्या भाग पहिला, उप विभाग चार मधील अ.क्र.१२ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार काढण्यात आले आहेत.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपअलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१००२०११८५८४३००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( प्र.चं.मयेकर )
शासनाचे अवर सचिव

प्रति,

महालेखापाल, (लेखा व अनुज्ञयेता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य,मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
निवड नस्ती , परि-४